संत श्रीगुलाबरावमहाराजांनी निर्मिलेली योग-साधन-प्रक्रिया

# मोक्षपट

## या खेळासंबंधीची माहिती



श्री ज्ञानेश्वर मधुराद्वैत सांप्रदायिक मंडळ

दहीसाथ, अमरावती

# एक साधन-प्रक्रिया

ग्रंथ वाचण्याचे कार्य नसेल त्याने हा खेळ भावनापूर्वक पाहिजे तितके वेळ खेळावा.

- नंतर रात्रौ स्वप्नांत काय चमत्कार होतो तो पहावा.

सात्त्विक स्वप्न वृद्धी होऊं लागले म्हणजे 'स्वप्ननिद्राज्ञानावलम्बनं वा' ह्या पतंजली स्वामींच्या सूत्रांवरील व्यास-भाष्यांत सांगितल्याप्रमाणें -

"योगसिद्धी होऊन कैवल्य मिळेल."

आठ दिवसातून दोन वेळ किंवा एक वेळ तरी निदान खेळण्याचा नियम करावा.



*- श्रीगुलाबरावमहाराज*

*(यष्टा १८. समयापदेश पृ.२१०)*

मधुराद्वैताचार्य श्रीगुलाबरावमहाराज विरचित
सूक्तिरत्नावली यष्टी १८ वी तील

# श्रौतक्रीडाविशेष

## (कैवल्यपट अर्थात् मोक्षपट या खेळासंबंधी नियम)



प्रकाशक

श्री ज्ञानेश्वर मधुराद्वैत सांप्रदायिक मंडळ,

दहीसाथ, अमरावती.

(मोक्षपट वेगळा : रु.१०)

**रु. १०**

आवृत्ति ४ थी
कलिवर्ष : ५१०९
इ. सन २००७

## ॥ ग्रंथोपलब्धि ॥

**श्रीज्ञानेश्वर संस्थान**

पाताळेश्वर मार्ग, महाल, नागपूर ४४००३२

**श्रीरंग घटाटे**

'गोकुळ' घटाटे ले आउट - ९, व्हीआयपी रोड, सिव्हिल लाईन्स, नागपूर. ४४०००१

टेली.०७१२-२५३३९९७ / मो.९३७२५२९७७०

**सु.शं.फणसळकर,**

सिद्धान्त-अपार्टमेंट, बी-३, 'सुयोग-मंगल' च्या मागे शनिवारपेठ, **पुणे** ३०./ टेली.०२०-२४४८०६४५

**संत श्रीगुलाबरावमहाराज भक्तिधाम, चांदूरबाजार,**

जि. अमरावती. टे.०७२२७–२४३१३१

**श्रीगुलाबरावमहाराज सर्वोदय ट्रस्ट आळंदी** (देवाची)

ता.खेड, राजगुरुनगर, जि.पुणे

मो.- ९४२३००६२०८ / ९८२२४४०५९१

**मुद्रक**

ऋचा ग्राफिक्स, स्वा. सावरकर चौक, खामलारोड, नागपूर.

www.gulabraomaharaj.org

# परिचय

(इ. स. १८८१ ते १९१५)

प्रज्ञाचक्षू श्रीगुलाबरावमहाराज. विदर्भातील माधानचे गुलाब गुंडोजी मोहोड.

नवव्या महिन्यात नेत्रहीनत्व, माधानसारख्या खेड्यातील जीवन, शिक्षणाचा अभाव आणि आयुष्य केवळ ३४ वर्षे ! अशी सर्वतः विपरीत परिस्थिती असूनही महाराजांनी केलेल्या ग्रंथलेखनरूप ज्ञानयज्ञाचे कार्य अजोड आहे. त्यांची श्रीकृष्णाचे ठिकाणी माधुर्यभक्ती असल्यामुळे ते स्वतःला ज्ञानेश्वरकन्या आणि कृष्णपत्नी म्हणवीत.

१ त्यांनी ''श्रीज्ञानेश्वर मधुराद्वैत संप्रदाय'' प्रवृत्त केला. हा नाथसंप्रदाय असून उपास्यत्वेकरून वारकरी पंथाची शाखा आहे.

२. संताची ज्ञानोत्तर पराभक्ती आणि शंकराचार्यांचा अद्वैत वेदान्त यांचा समन्वय करून शास्त्रीय खंडनमंडन पद्धतीने भक्तिशास्त्राची नवीन स्वरूपात मांडणी केली.

३. भगवंताचा सगुण विग्रह मिथ्या नसून सच्चिदानंदघन शुद्ध ब्रह्मस्वरूप आहे. तो ज्ञानानेही नाश पावत नाही, यासाठी अगदी नवीन शब्दयोजना सुचवून **शंकराचार्यांच्या अद्वैतात 'अनध्यस्तविवर्त' या भक्ति-संकल्पनेचे नवे योगदान दिले.**

४. डार्विन, स्पेन्सर, बेझंट वगैरे पाश्चात्य तत्त्वेत्यांच्या विचारसरणी किंवा इलेक्ट्रॉनिक थियरीज सारख्या अत्याधुनिक मीमांसा देखील युक्तिपरिपूत आर्य-सिद्धान्तांपुढे कां टिकत नाहीत, याचे सडेतोड युक्तिवादाने प्रतिपादन केले.

५. न्यायदर्शनातील प्रत्यक्षखंडातून आर्यांच्या पुरातन भौतिक शास्त्रांचे पुनरुज्जीवन कसे करावे, याचेही उत्कृष्ट मार्गदर्शन केले.

६. भारतीयांच्या उज्वल इतिहासाची आणि अक्षुण्ण शिक्षणपरंपरेची ख्रिस्ती इंग्रजांनी बुद्धिपूर्वक केलेली विकृती उघडकीस आणली.

७. आर्य हा वंश नाही. आर्य बाहेरून भारतात आले नाहीत. आर्य म्हणजे सुसंस्कृत मनुष्य हाच अर्थ आहे. ३००० वर्षांपूर्वी सर्व जगात सनातन आर्य संस्कृतीच पसरलेली होती. हे प्राचीन ऐतिहासिक सत्य अनेक प्रमाणे देऊन नव्याने प्रस्थापित

केले.

८. भक्ती, वेदान्त, सांख्य, योग, न्याय, आयुर्वेद, संगीत, साहित्य, नाटक, व्याकरण, कोश, क्रीडा, लिपी वगैरे अनेक विषयांवर 'सूत्र' आणि भाष्य रचनेपासून प्रकरण ग्रंथांपर्यंत विविध प्रकारची ग्रंथनिर्मिती निरनिराळ्या भाषाशैलीत करून त्या त्या शास्त्रात महाराजांनी नवेनवे मौलिक योगदान दिले.

त्याचे सर्व लिखाण प्रखर तर्कवादाच्या चौकटीत आहे. त्यांच्या सर्व लेखनात वेद, पुराणे, रामायण, महाभारत, स्मृती वगैरेंची संतवचनांच्या आधाराने समन्वय केलेली शास्त्रीय मांडणी आहे. आधुनिक काळात सहसा न सांपडणारा हा फार मोठा विशेष महाराजांच्या ठिकाणी स्पष्टपणे जाणवतो.

९. जगातील सर्व धर्मांत आणि हिंदुसमाजातील विभिन्न घटकात परस्पर द्वेष वाढू नये म्हणून महाराजांनी समर्थ असा **सर्वधर्मसमन्वयाचा मूलगामी सिद्धान्त** सर्वांपुढे मांडला. आर्य-अनार्य, आर्य-दस्यु, आर्य-द्रविड, ब्राह्मण-ब्राह्मणेतर, उत्तर-दक्षिण, इत्यादि द्वेषभावनेला आणि त्यामुळे उत्पन्न झालेल्या असंतोषाला मूठमाती देण्याचे समन्वयरूपी प्रभावी हत्यार विचारवंतांच्या हाती दिले.

अशा मौलिक विचारांनी भरलेल्या महाराजांच्या वाङ्मयाचा विस्तार बराच मोठा आहे. सवाशेच्यावर ग्रंथसंख्या, पत्रे व समीक्षा ११९, अभंग २५००, पदे २५००, गीते १२५०, श्लोकादि कवित्व १०००, ओवीसंख्या २३००० असून अंदाजे ६००० पृष्ठे आहेत. ही सर्व रचना संस्कृत, मराठी, हिन्दी, वज्रभाषा व वऱ्हाडी इ. भाषांतून झाली आहे. साहित्यिक दृष्टीनेही प्रस्तुत वाङ्मयाचा कस ज्ञानेशांच्या कन्येला शोभणाराच आहे.

अर्भकावस्थेत नेत्रहीन झालेल्या महाराजांच्या केवळ ३४ वर्षाच्या अल्पायुष्यात झालेल्या या सर्व ज्ञानशाखांना कवेत घेणारा मूलभूत वैचारिक योगदानाचा विचार केला असता - अल्पवयात अजोड कार्य करणाऱ्या पूज्यपाद श्री आद्यशंकराचार्य व श्रीज्ञानेश्वरमहाराज यांचीच आठवण येते आणि भारतातील महर्षी भगवान् श्रीव्यासांच्या सर्वस्पर्शी ज्ञानपरंपरेचा स्रोत अखंड असल्याची जाणीव होते.

०००

श्रीगुलाबरावमहाराज : सूक्तिरत्नावली यष्टी १८ तील क्रीडापट

# श्रौतक्रीडाविशेष

(कैवल्यपट अर्थात मोक्षपट)

|| श्रीज्ञानेश्वरमाउली समर्थ ||

## अध्याय १ ला

**श्रीमद् ज्ञानेश्वराचार्य नत्वानंदमजं विभुम् ।**
**श्रौतक्रीडाविशेषोऽयम् बालबोधाय तन्यते ॥१॥**

यालोकांमध्ये आपलें तीनच गोष्टी मनोरंजन करितात. स्त्री, काव्य आणि खेळ.

**१.** त्यामध्यें स्त्री जी आहे ती रजोगुणी असून तिला खर्च वगैरे पुष्कळ लागत असल्यामुळे ती परिणामी दुःखदात्री आहे.

**२.** आतां काव्य हें मनोरंजन करितें, परंतु तें विद्वानांचे. परंतु रसहानि झाली असतां दुःखही पण देते. म्हणून कार्यापुरतेच अंगी मनोरंजन करण्याचे यांत सामर्थ्य आहे.

**३.** आतां राहिली क्रीडा म्हणजे खेळ. खेळ हाच सर्वांना सर्वदा मनोरंजन करणारा आहे.

प्रश्न :- अहो, मनोरंजन करणारा खेळच जर म्हणतां तर निद्रा, समाधि इत्यादिहि ठिकाणी मनोरंजन होतें. मग त्यांनाही खेळच म्हणावें लागेल.

उत्तरः- अरे, तुला मनोरंजन शब्दाचाच अर्थ मुळीं समजला नाही. कारण सुषुप्ति, समाधिआदि आत्मयाच्या जवळच्या सुखामध्यें मनच नसतें, तर मनोरंजन कोठून होईल? तेथें आनंद मात्र असतो म्हणूनच खेळ हा आनंददायक म्हटला नसून मनोरंजन आहे असें म्हटलें आहे. म्हणून समाधिआदि स्थानी अतिव्याप्ति नाहीं. आतां खेळ म्हणजे काय याची व्याख्या सांगतों.

### *खेळाची व्याख्या व पांच अंगे -*

''कल्पित वस्तूचे आकार घेऊन अथवा अधिष्ठान खरें आणि वस्तु खोटी- म्हणजे मृत्तिका खरी आणि तिची केलेली कल्पना खोटी, याप्रमाणें प्रातिभासिक सत्तेचे आकार कल्पून आपल्या मनाला आवडेल तसा समाधानपूर्वक कालक्षेप करणे'' याला खेळ म्हणतात. त्या खेळाचीं पांच अंगे आहेत. **नाम, रूप, संख्या, योजना आणि सूचना.** त्यांतली चार साधनरूप आहेत आणि सूचना हें फळ आहे. उदाहरणार्थ - आपण सारीपाट घेऊं. या खेळांत ही पांचही अंगे लागू पडतात -

**१.** पहिले अंग **नाम :-** म्हणजे फांसे, नरदा, पट, (अक्ष, सोंगट्या) घरें इत्यादि जे शब्द तें नाम म्हणावें. अक्ष, सोंगटी जर नसली तर मुक्याने कांही खेळ खेळतां यावयाचा नाहीं. बुद्धिबळाचा खेळ जरी मुक्यानें चालतो तरी राजा, प्रधान इत्यादि नावें मनांत तरी घेतलींच पाहिजेत; हें पहिले अंग झालें.

**२.** दुसरें अंग **रूप :-** नरदा लांबट असाव्या, फांसे लांब असावे. कांही फुलें व कांहीं घरें इत्यादिकांचे जे आकार त्याला

रूप म्हणतात. हे नसलें तर नुसतें वांझेचा मुलगा म्हणून केवळ खेळ घडावयाचा नाहीं.

३. तिसरें अंग **संख्या :-** सोळा नरदा असाव्या; तीन फांसे असावे इत्यादि. हे नसले तर सर्वच अंधाधुंदी माजेल.

४. चौथे अंग **योजना :-** किती दानें पडली असतां सोंगटी कोणते जागी द्यावी? इत्यादि गोष्टींना योजना म्हणतात. ह्या योजना मात्र भिन्न भिन्न असतात आणि योजनेवरच खेळाचा भेद अवलंबून असतो. नाम, रूप, संख्या ही सर्व खेळांत सारखींच असतात. आणि योजनेवरच खेळाचा भेदही अवलंबून असतो.

५. आतां पांचवे अंग म्हणजे **"सूचना"** होय. 'खेळाचे शेवटी अथवा आरंभी मनाचे जे परिणाम' त्यांना सूचना म्हणतात. एकानें जिंकले असतां हर्ष व दुसरा हरला असतां त्याला खेद ह्या गोष्टी खेळ खोटा असतांही घडून येतात. खोट्या खेळातही मनाला हर्ष अथवा खेद होणें हें त्या जगन्नियंत्याच्या मायेचीच करणी म्हणावी लागते. परंतु आपल्या अभिमानामुळे असें होते असे म्हणणें अधिक सयुक्तिक होईल. ही गोष्ट कल्पितातल्या कल्पितांत झाली. पण ह्या गोष्टीला व्यावहारिकपणा सुद्धां देतां येतो. सारीपाटाच्या खेळाशीं पैशाचा 'पण' बांधला म्हणजे मग आले त्यांत व्यवहारत्व. याप्रमाणें कल्पित वस्तु देखील क्रीडाद्वाराने व्यावहरिक होतात; म्हणजे कल्पित वस्तूवरून जर कांहीं व्यवहारज्ञान होतें, तर कल्पित वस्तूवरून परमार्थ होणेंही कांहीं मोठेसें दुर्लभ नाही. मात्र पैशाचा 'पण' बांधला म्हणजे जशी सारीपाट खेळण्याची

चुटपुट लागते, त्याप्रमाणे खेळातही परमार्थाची चुटपुट लागलेल्या पुरुषाला मुक्ति मिळण्याचा संभव आहे. असे व्यावहारिक व पारमार्थिक खेळ जगांत पुष्कळ आहेत. परंतु या आम्ही निव्वळ गप्पाच मारतो असें कोणी म्हणूं नये. कारण पुराण व इतिहास यांतही या गोष्टीं कांही कमी नाहींत.

अक्षक्रीडेनेंच रुक्मिणीच्या भावाचें म्हणजे रुक्मीचे प्राण बलिरामानें हरण केले. ही गोष्ट भागवतांत आहे. आणि अक्षक्रीडेनेंच पांडवांना वनगमन करावें लागले ही गोष्ट महाभारतात आहे. भगवान् म्हणतात - **"द्यूतं छलयतामस्मि"** याप्रमाणे द्यूत व अक्षक्रीडा हे उपलक्षण आहे. म्हणजे दिव्याच्या उजेडाने जर केंस दिसतात तर ते सूर्याच्या उजेडाने कां दिसणार नाहींत? याप्रमाणें द्यूत वगैरे तामस खेळांना जर परमेश्वर आपली विभूति म्हणतो तर पारमार्थिक जे सात्त्विक खेळ त्यांना परमेश्वर आपली विभूति कशी म्हणणार नाही? अर्थात् म्हणतो; हें कैमुतिक न्यायानें (किमिति न्यायानें) सिद्ध होतें. फडणीस नानासाहेंबानें बुद्धिबळाच्या खेळामध्ये लढाईचें तत्त्व दाखवून दिले होतें, हें अर्वाचीन इतिहासामध्ये प्रसिद्ध आहे. वावडी (पतंग) उडवितां उडवितां आकाशातील विद्युत् तळी कशी येते याचा शोध लागला. यावरून क्रीडा ही सायन्सविरुद्ध नाहीं हे सिद्ध होते. **"श्रीकृष्णांनीं बालपणीं जे अनेक खेळ केले त्याचे कारण अनेक शास्त्रें दाखवून देणें हेंच होय."** आतां व्याकरण शास्त्रावरील महाभाष्यांत अशाप्रकारच्या खेळाशिवाय व्याकरण लागत नाहीं म्हणून 'क्रीडाविशेष' भगवान्

श्रीमदाचार्य पतंजली स्वामींनीहि दाखविले आहेत. त्याप्रमाणें एका खेळानें वेदांताचेंही मोठे कार्य झाले असा एक इतिहास पौराणिक (व्यास) सांगतात. तो इतिहासच येथें घेतों.

## श्री नारदांची कथा

एके समयीं मम हृदयरमण श्रीकृष्ण सभेंत बसले असतां तेथें स्वामी नारद आलेले पाहून भगवान् म्हणाले, ''नारदा, आपण अनुग्रहीत आहांत काय?''

तेव्हां नारद म्हणाले ''भगवंताला सर्वच कांही ठाऊक आहे.''

हें नारदांचे वाक्य ऐकून देवांनी असा विचार केला कीं, जरी हा नारद पूर्ण आहे तरी सद्‌गुरुमहिमा प्रगट दाखविण्यासांठी आपण कांही युक्ति केली पाहिजे.

मग भगवान् म्हणाले - ''नारदा, आमच्या द्वारावर जे तुम्हांला अगदी ब्राह्ममुहूर्ती दिसतील त्यांना गुरु मानून त्यांची सेवा करा.''

नारदांने 'ठीक आहे' असें म्हणून दुसऱ्या दिवशीं ब्राह्ममुहूर्ती द्वारावर येऊन पाहिलें तों तेथें एक मनुष्य बसलेला दृष्टीस पडला. नंतर भगवंतांनी सांगितलेला हाच आपला गुरु आहे असें समजून नारदानें त्यास नमस्कार केला, आणि क्षणभर तेथेंच बसले. परंतु अरुणोदय झाल्यावर हा मनुष्य धीवर (कोळी) आहे हे नारदाला कळल्यावरून फार चिंतातुर होऊन पुन्हा श्रीकृष्णसभेत आले.

तेव्हा श्रीकृष्ण म्हणाले, नारदा, आपण गुरुसेवा केली का?

तेव्हां नारद म्हणाले, 'केली, पण --' असें बोलून संदिग्ध होत्साते पुढें बोलणार इतक्यांत श्रीकृष्ण म्हणाले.

''नारदा, आपणाला चौऱ्यांयशीं लक्ष योनी अवश्य भोगिल्या पाहिजेत. कारण सद्गुरूच्या स्वरूपाविषयीं ज्याला संशय आहे, तो जन्म-मरणाच्या फेऱ्यांतून सुटलेला असा कोणीच नाहीं.''

ही गोष्ट नारदाच्या काळजास लागल्यासारखी होऊन ते लवकर लवकर धांवत येऊन त्याच धीवरापाशीं आले आणि साष्टांग नमस्कार करून झालेली सर्व गोष्ट निरूपण केल्यावर म्हणाले,'भगवन्, माझें रक्षण करा, रक्षण करा.' तेव्हा त्या धीवररूपी गुरूनें एक खूण सांगितली व ती घेऊन नारद सभेमध्यें आले आणि श्रीकृष्णास म्हणाले.

महाराज, ''हा मी चौऱ्यांयशी भोगायला तयार आहे पहा. परंतु त्यांचें (म्हणजे चौऱ्यांयशींचे) ज्ञान होण्यासाठी, त्या मला एका कागदावर लिहून दाखवाव्या.''

नंतर ईश्वराने 'बरें' म्हणून त्या सर्व योनी लिहून नारदाजवळ दिल्या. तेव्हां तो कागद तेथेंच नारदांनी आंथरून त्यावर लोटांगण घालूं लागले.

तेव्हां देव म्हणाले, 'नारदा, हें काय करीत आहां? याचा अर्थ आम्हांस कांहीं कळत नाही.'

तेव्हा नारद म्हणाले, 'देवा, मी आपणांस आतांच सांगितलें कीं मी या योनी भोगण्यास तयार आहें, आणि त्याच या मी आतां

भोगून टाकीत आहे."

देव हांसून म्हणाले, "अहो, केवळ चित्रावर लोळण्याने योनी भोगणें होत असतें काय?"

नारद म्हणाले, "हो अवश्य होतें याला जीवभूत प्रमाण नाहीं तर ईश्वरभूत प्रमाण आहे. कारण देवा, जगतांतील जेवढीं म्हणून चित्रे आहेत तेवढी आपणच घडविली आहेत. मग यात व त्यात भेद तो कोणता? शिवाय ब्रह्मदृष्टीने हे सारे जगत् चित्रवतच आहे. कारण चित्रांतील व्याघ्राची भीति वाटली तर तो देखील स्वप्नांत खराखुरा दिसतो. ही जर साधारण जीवाची गोष्ट आहे तर ईश्वरी चित्रावर तशी भावना केल्यानें माझी तशी कशी भावना होणार नाहीं?"

ही गोष्ट ऐकून परमात्म्याने एकदम आसनावरून उठून नारदास साष्टांग नमस्कार करून आलिंगन दिलें आणि म्हणाले-

"विधितनया, आपण सनत्कुमारांच्या अनुग्रहानें केव्हांच मुक्त झालां आहांत. धीवर तो आपणांस काय सांगणार? परंतु सनत्कुमारांनी सांगितलेल्या मुक्तीवर आपली कितपत निष्ठा आहे हे पाहण्याकरिताच मी ही युक्ति केली होती. आपण मुक्त होतां तर आपणास चौऱ्यांशींची भीति कां वाटावी? परंतु अशा वेळीं तो धीवर आपणांस सद्गुरु झाला नाही काय?"

नारद म्हणाले," भगवन्, त्यावर माझी पूर्ण निष्ठा बसली आहे. आईचें दूध जसें लेकरास वाढवितें तसें पृथ्वीमातेंतून निघालेलें अन्नही वाढवितें, त्याप्रमाणें मुक्तीचा उपाय सांगणारा व मुक्ति दृढ

पटवून देणारा हे दोन्ही मी सारखेच मानतो." हें बोलणें झाल्यावर नारदांला श्रीकृष्णांनी आपल्या आसनावर बसवून घेतलें.

या इतिहासावरूनच आपणास असें ग्रहण करितां येईल कीं दृष्टिसृष्टि-वादांत जगत् हें प्रातिभासिक आहे, आणि असें दाखविणारें कांहीं खेळही आहेत. **जगत् हें चित्र आहे अशा प्रकारच्या भावनेने जग चित्रच दिसून पुरुष मुक्त होतो** असें विद्यारण्य स्वामींनी पंचदशीच्या सहाव्या प्रकरणांत म्हटलें आहे -

**चित्रदीपमिमं नित्यं येऽनुसन्दधते बुधः ।**
**पश्यन्तोऽपि जगच्चित्रं ते मुह्यन्ति न पूर्ववत् ॥२०॥**

आणि याच ग्रंथाच्या दहाव्या प्रकरणांत **जगत् नाटकरूप आहे असें दाखविलें आहे.** योगवासिष्टांत अशा प्रकारचे पुष्कळ खेळ सांगितले आहेत हें कांही सांगावयास नको. चेंडुफळीचें उपलक्षण करून असा एक खेळ श्रीमत्सद्‌गुरु ज्ञानेश्वराचार्य महाराजांनीही अनुभवामृताच्या सिद्धहरणनिरूपण नामक नवव्या अध्यायांत सांगितला आहे.

**म्हणोनी हे चेंडुफळी । देखिले का कें व्हेळी ।**
**परंतु बोलिजे हे सरली । प्रबुद्धांची ॥**

शिवाय त्यांनी ज्ञानपट, सोपानपट, वगैरेही पुष्कळ खेळ केले आहेत. ते जरी उत्तम आहेत. तथापि मुलीला खेळता यावे म्हणजे त्यांची मी कन्या असल्यामुळे कन्याबुद्धीनेंच मी या क्रीडाविशेष फुलांची माळ करून त्यांचे चरणीं गजरे वाहतें.

ह्या खेळांत आतां पांचही अंगें कशी लागू पडतात हें

क्रमाक्रमानें पाहूं. त्यांत पांचव्यापासून पहिल्यापर्यंत जाऊं.

### *सूचना*

या खेळात (१) कैवल्य हें स्थान मुख्य आहे. त्यांतही पराभक्ति हें श्रेष्ठतम स्थान आहे. (२) कैवल्याच्या अपेक्षेनें जेवढे लोक आहेत तेवढ्या आडवाटा आहेत. परन्तु (३) भक्ति नसली तर कैव्ल्यालाही विशेष किंमत नाही, हेंच सर्व संतांच्या हृदयांतील रहस्य आहे; आणि हीच या खेळांतील सूचना म्हणजे पांचवें अंग होय.

### *योजना*

आतां चौथे अंग सांगतो. व्याकरणांत किंवा त्या वरील महाभाष्यांत जसे नियम किंवा अपवाद केले आहेत त्याप्रमाणेंच या खेळांतही समजावें. त्यांत आधीं नियम सांगतों आणि मग अपवाद सांगतो. नियम येणें प्रमाणे :-

१. जितके खेळणारे असलीत तितक्यांनी आपआपल्या रंगाच्या वस्तु घेऊन **मनुष्यलोकांपासून खेळण्यास आरंभ** करावा.

### *भावना*

१. मात्र ही माझी वस्तु आहे अशीं भावना न करितां ती वस्तु मीच आहें अशी भावना करावी.

२. ज्या घरांत शिडी असेल तेथून चढून शिडीचें वरचें टोक ज्या घरांत असेल त्यांत स्थिर व्हावें. आणि ज्या घरांत सर्पाचे तोंड असेल तेथून निघून सर्पाचे पुच्छ जेथें असेल तेथें खाली यावें.

३. फांसे किंवा कवड्या घेऊन डाव टाकून खेळावें. त्यांत ***अंक क्रमांक दान** किंवा ***युगपद् अंकदान** असा कोणताही नियम करावा. अंकक्रमदान म्हणजे जितक्या कवड्या चित पडतील तितकें दान घेणें आणि युगपत् अंकदान म्हणजे पांच कवड्या उपड्या पडल्या असतां पंचवीस इत्यादि चौसरीप्रमाणें. फांशाच्या खेळांत मात्र ही फारशी भानगड नाही परन्तु -

*भावना*

४. एवढें मात्र लक्षात ठवावें कीं डाव टाकीत असतांना आपण मनुष्य लोकांत असून मुक्तीकरितां खटपट करीत आहोत ही भावना दृढ धरावी. म्हणजे **तसबिरीच्या पूजनानें जसा परमेश्वर प्रसन्न होतो तसाच या कैवल्याच्या भावनेनेंही आपण परमेश्वराच्या अनुग्रहानें मुक्त होऊं यांत संशय नाही.**

घटकाभराच्या भावनेनें जें काम होतें तशीच भावना घडीघडी वाढविली असतां कैंवल्यास जाण्याची आपल्यास तर अगदी खात्रीच वाटते. ज्ञानेश्वरीत एके ठिकाणी असे म्हटलें आहे "अर्जुना तुला एकदम माझ्या ठिकाणी चित्त लावतां येत नसल्यास तूं क्षणक्षणां लावीत जा. आणि जितके क्षण तुझें चित्त माझ्याकडे येईल, तितके विषय आपोआपच सुटत जातील. आणि असें क्षणक्षणां वाढतां वाढतां सरते शेवटी तूं माझ्या स्वरूपालाच येऊन मिळशील." पण ही गोष्ट नाक धरून एखाद्या वनांत जाऊन करण्यापेक्षा खेळानेच जर होत असली तर तिचा लाभ कोण अज्ञ मनुष्य आहे कीं सांडून देईल? ज्ञानेश्वर महाराजांनी

एके ठिकाणी म्हटलें आहे कीं, 'रोग जाये दूध सारखें तरी निंब कां सेवावा,' नियम सांगतांनाही सिद्धांताची गोष्ट सांगावी लागली याबद्दल क्षमा असावी.

अशा वैदांतिक खेळांत द्वेषभाव राहत नसल्यामुळे विलक्षण मैत्री वाढते. हा एकीचा व्यावहारिक फायदा समजावा.

५. आतां ज्या घरात सर्प किंवा शिडी कांहींच नसेल तर त्या गृहात तेथेंच रहावे.

६. जीवन्मुक्त झाल्याशिवाय विदेहमुक्त होतां येत नाही व – पराभक्तींतही जातां येत नाही.

## *नियमाला अपवाद*

आता अपवाद सांगतो :- सर्पांच्या घराचें दान आलें असतां पतन होतें ही गोष्ट खरी, परंतु -

१. ब्रह्मलोकांतील **"मोक्ष"** शिवलोकांतील **"उमापति लोक"** आणि वैकुंठातील **"गोलोक"** यांतील स्थानांतून सर्पाचे दान आले असतांही पतन होत नाहीं तर कैवल्याचें दान पडलें म्हणजे कैवल्यास जावें लागतें हा एक अपवाद झाला.

२. ब्रह्मलोकांतील भोग लोकांत (पारमेष्ठ्यांत) असतां पांच फेरांचे राज्य देऊन तेथून नंतर **क्रमांक दानांतून तीन** पडले असतां किंवा **युगपत् अंकदानांतून पवदान** पडलें असतां कल्पान्तरोत्थानांतून त्याला खाली आणावें.

३. बाकीची दाने पडली असतां त्याला खालीं आणावयाचें नाही.

४. त्या डावांत पव पडल्यावर बाकीचीं दाने त्या डावांच्या (रमणीय घराच्या) खाली द्यावयाची.

५. परंतु भोगलोकांतील पुरुषांना आणखी दुसरी एक अडचण आहे. ***अविद्येचे दान** पडलें म्हणजे एकदम खाली यावें आणि ***मायेचें दान** पडलें तर त्याला सहा फेरांचें राज्य देऊन नंतर ब्रह्मलोकांतील मोक्षांत सर्प शिडीशिवाय यावें.

६. ब्रह्मलोकांतील मोक्षांत कितीही जण असले तरी ते सर्व पर्यंकस्थ पुरुषाचे (ब्रह्मदेवाचे) स्वाधीन असल्यामुळे त्याच्या बरोबर त्यांना मुक्त झाले पाहिजे.

७. परंतु पर्यंकावर दुसरा ब्रह्मा आला म्हणजे पहिल्या ब्रह्मदेवाची मुक्तता होणार आणि त्याबरोबरच सर्वांची मुक्तता होणार.

८. परन्तु मागून येणाऱ्या ब्रह्मदेवाचें दान पडून पहिल्या ब्रह्मदेवाचे दान पडले नाही तर मागून येणाऱ्या ब्रह्मदेवास पर्यंकावर जुगस्थानी द्यावें.

९. परन्तु पहिल्या बह्मदेवाची मुक्ति झाल्याशिवाय मागल्या ब्रह्मदेवास मुक्त होता येत नांही आणि पहिल्या ब्रह्मदेवाबरोबरही मुक्त होता येत नाही.

१०. ब्रह्मलोकांतील भोगलोकांतून मात्र कैवल्याशिवाय कैलासादिकांतही जातां येतें. पण - उमापति लोकांत आणि गोलोकांत जाता येत नाही.

११. भूलोकांतील अविद्यादर्शनेच्छेमधून शिडीनें मूलाविद्येंत यावें

व तेथल्या सर्पातून नरकांत जावें.

१२. मनुष्यलोकांतून खेळण्यास आरंभ होतो खरा, परंतु महानरकांत पडले असतां, पव किंवा चार घेऊन क्षुद्रनरकांत यावे आणि नंतर कितीही दानें पडली तरी मनुष्यलोकापासूनच खेळावें.

१३. म्लेंच्छ मताचें दान पडलें तर बेहस्त लोकांत शिडीने जावें व तेथून सर्पानें मृत्यूंत यावे व तेथें त्यास तीन फेरेपर्यंत पडूं द्यावें व नंतर चौथे फेऱ्यास वाटेल त्या दानानें महानरकांत यावें व तेथून महानरकाच्या नियमाप्रमाणें खेळावे.

१४. गोलोकांतील लोकांना दहा तीन पडले तर ते भक्तजनकलहावच्छिन्नांत जाऊन तेथून खाली पडावयाचे; नाही तर कैवल्याचे दान घेऊन जीवन्मुक्तीत जावयाचे.

१५. ब्रह्मदेवाला मुक्त होण्याची पाळीं आली तर मोक्षांत लोकच असले पाहिजेत असें नाही. पर्यंकस्थानी दुसरा ब्रह्मदेव असला म्हणजे झालें. - परंतु दुसरा होणारा ब्रह्मदेव शतजन्म ब्रह्मकर्मसमुच्चयांतील शिडीनेंच आलेला असला पाहिजे. - दुसऱ्या कोणीकडूनही आणूं नये.

१६. दुसऱ्या कोणाची दुसऱ्या ठिकाणाहून दानें पडली तर साम्राज्यादि पांच लोकांतील कोणातरी लोकांत द्यावी अथवा आधिपत्य लोकांत द्यावीं.

१७. गोलोक किंवा क्षीराब्धिलोक यांतून दहा तीन पडले असतां तेथील लोक अवतार घेऊन जशी इच्छा असेल त्याप्रमाणें अयोध्या

किंवा नंदनवनांत यावयाचें व येथून आपले दान देऊन लोकोद्धार करावयाचा.

१८. अवतारांचे कृत्य झाल्यावर त्यांना क्षीराब्धींत नेऊन ठेवावयाचे. अवतार घेणारास नरकाचें दान पडल्यास त्याला नरकांत आणावयाचें नाही. अवतारासंबंधी नियम तीन हे सर्व लक्षपूर्वक पहावे.

१९. दैवयोगानें सर्वच जण ब्रह्मलोकांतील मोक्षांत गेल्यास आणि पर्यंक स्थानी कोणी नसला तर ज्यांचें वरिष्ठ दान असेल अशा दोघां जणांनी पर्यंकावर आरोहरण करून नंतर एका ब्रह्मदेवा बरोबर कैवल्याचे दान पडले म्हणजे सर्वांनी मुक्त व्हावे.

२०. परंतु येथे असें कोणी समजूं नये की ब्रह्मदेवाच्याच शक्तीनें मोक्षांतील सर्व लोक मुक्त होतात. तर ब्रह्मदेवाच्या दानाप्रमाणें मोक्षांतील लोकांचीही दानें पडली पाहिजेत. आतां सामान्य नियम सांगतों.

## *सामान्य नियम*

२१. मला किती पाहिजेत हें पटावरून पाहून घेऊं नये. व खेळणारांनी पाहूंही देऊ नये. जोडून डाव टाकला असतां कैवल्यातून ही खाली फेकावें कारण लबाडीनें कैवल्य कधीही मिळत नाही. लबाडीनें कैवल्यांत गेला तरी, तो चित्रांतील कैवल्यांत जाणारा होय. खेळाबरोबर भावनेनें कैवल्यांत जाणारा नव्हे. म्हणून भावनायुक्त पुरुषांना चित्रांतून खोट्या मनुष्याला बाहेर फेकण्याचा अधिकार आहे.

२२. माझी नरद म्हणणारांना किंवा कैवल्यातील कोणाचा अपमान करणारांनाही हीच गती द्यावी.

२३. क्रीडारंभ करतांना आपल्या कुलदेवतेचे किंवा गुरूचे स्मरण करावे.

२४. पराभक्तीत पोहोचलेल्या पुरुषांना खेळणारांनी मानसिक नमस्कार करावा. बाकीचे नियम बांधणें हरीभाऊ केवले यांचे कडेस आहे. हें या खेळाचे **योजना** नामक चौथें अंग झाले.

२५. तिसरें अंग म्हणजे संख्या हें दानादिकांची **संख्या,** घरांची संख्या यावरून स्पष्ट कळून येतें.

२६. शिड्या, साप, घरें त्रिकोण वर्तुळ इत्यादिकांच्या आकृति म्हणजे **रूप.** हें दुसरें अंग.

२७. या खेळाचें पहिले अंग म्हणजे **नाम.** याचें संस्कृत नाम **'श्रौत क्रीडा विशेष'** अथवा दुसरें नांव **'कैवल्यपट'** - कैवल्य, वैकुंठ, शिवलोक, ब्रह्मलोक इत्यादि या पटातील घरांची नांवे.

**ऐसा हा पंचांग संपूर्ण । क्रीडा विशेष गुंफोनि जाण ।**
**श्रीज्ञानेश्वर चरणीं समर्पण । सप्रेमें केला ॥**

---

*टीप- जे आधार घेऊन हा पट तयार केला त्या श्रुतिस्मृतिपुराणादिक ग्रंथातील आधारवाक्यांचा संग्रह आम्ही सवडीनें देणार आहो.*

---

# अध्याय दुसरा

|| श्रीमत्सद्‌गुरु ज्ञानेश्वर माउली समर्थ ||

**श्रीमत्सद्‌गुरु ज्ञानेश्वर चरणीं। साष्टांग प्रणिपात करूनी।**
**द्वितीयाध्याय उभारणीं। प्रौढक्रीडार्थ करितांहे ॥१॥**

पहिल्या अध्यायात जें कांही सांगीतले त्यात भावनेचे ज्ञान फार थोडेसेंच आहे. खेळाचें पंचांग व आणखी कांही गोष्टी याचाच विचार अधिक आहे. परन्तु सामान्य लोकांविषयीं तितकी भावना अगदीं पुरे आहे. परंतु ज्यांना खेळांत खरोखरच पटाईत व्हावयाचे असेल, आणि त्यांचे बरोबर, - ज्यांची भावना टिकाऊ झाली असून कैवल्यापर्यंत ज्यांना सारख्या रीतीनें नेता येत असेल त्या महात्म्यांकरितां मी येथें विशेष काही लिहीतों -

योगामध्यें आसनांनी प्राण व चित्त स्थिर होतें असें सांगितलें आहे. परंतु एका कवीनें असें म्हटलें आहे की "तुम्ही जर आशा मारणार नाही व आसन मांडत बसाल तर त्यापासून तुमचे कार्य मुळीच होणार नाही. हा कांही कसरतीप्रमाणें पहिलवानीचा खेळ नव्हे. त्याला यम-नियमरूपी भावनेचे चांगले पाठबळ पाहिजे. "हीच गोष्ट आमच्या खेळासही लागू पडते." **भावना केल्यावाचून खेळणें म्हणजे फाजिल करमणूक करणेंच होय."** म्हणून सामान्य लोकांविषयी भावनेचे प्रकार पहिल्या अध्यायात सांगितले आहेत.

आतां तीव्र मुमुक्षु महात्म्यां लोकांकरिता भावनेचे प्रकार सांगतें. **"जी वस्तू पटावर खेळावयास घेतली असेल ती 'मी आहे' असे समजून खेळण्याला आरंभ करीत जावा."** हे पहिलेच लिहीले आहे. ही भावना दोन प्रकारची आहे. १. शाब्दीभावना व २. आर्थीभावना. पण हें शब्द येथें पारिभाषिक आहेत.

## *शाब्दी भावना*

ज्याला आर्थी भावना करिता येत नसेल त्याने शाब्दी भावना करावी म्हणजे 'माझी पिंबळी वस्तु आहे, तिला ब्रह्मलोकात न्या' असे न म्हणता 'मीच ब्रह्मलोकात जातों,' 'स्वर्गास गेलों' इत्यादि शब्दाचा उपयोग तरी निदान करावा. अशाच प्रकारच्या आणखी ज्या भावना असतील त्या अहंता किंवा ममता रूपानें आपल्याच ठिकाणी ओढून घ्याव्या, व तसेच शब्द उच्चारावे - ह्याला शाब्दी भावना म्हणतात; म्हणजे

* ''मनानें चिंतन होत नसेल तर शब्दांनी तरी विधियुक्तच उच्चार केला पाहिजे; त्याच्या विरूद्ध शब्द उच्चारल्यास त्याला पंचवीस फेर होतपर्यंत महा नरकांत टाकून द्यावे.'' ही गोष्ट सामान्य लोकांसही लागू आहे.

## *आर्थी भावना*

आता शदांनी न बोलताही ज्याला मनानें चिंतन सारखें करितां येतें, अशा पुरुषांनी आर्थीभावना करावी. ''मनोवृत्तीचा प्रवाह चिंतनाने सुरु ठेवणें याचें नांव आर्थीभावना.''

शाब्दीभावना करणाराने हळु हळु आर्थीभावनेंत गेलें

पाहिजे. मग तो एका दिवसापासून एका युगापर्यंत कितीही कालानें जावों. आर्थीभावना करणारास शाब्दी भावनेची विशेष जरुरी नाही. परंतु आर्थीभावनेचें अवधान चुकल्यास शाब्दी भावनेच्या द्वाराने पुनः आपलें ठिकाणी आणावें.

आतां पुढील नियम दोन्ही प्रकारचे भावनेस सारखेच लागू आहेत. परंतु मंदांनी शब्दांनी नियम पाळावयाचे व तीव्रांनी चिंतनानें पाळावयाचे - एवढाच काय तो भेद. हे भावना करण्याचे सामान्य पांच प्रकार आहेत. व त्यात पोट भेद अनेक आहेत.

### *भावनांचे पांच प्रकार*

१) तृप्ति २) निर्भयता ३) उपेक्षा ४) भीति ५) पश्चात्ताप.

१. कैवल्यस्थानांत गेलें असतां **तृप्तीची भावना** करावी.

२. ब्रह्मलोकातील मोक्ष व पर्यंकस्थान, परमलोकांतील सर्पाच्या वरचे लोक व उमापतीलोक आणि गोलोक ह्यांत **निर्भय** भावना करावी. तसेंच अलोकांमधील लोकांतही निर्भय भावना करावी. सारांश मुख्य स्थानी **तृप्त** व्हावें. गौणमुक्ति स्थानीं जे असतील तेथें **निर्भय** रहावें.

३. संदिग्धस्थानीं **उपेक्षात्मक भावना** धरावी.

४. भोगस्थानी **भीतीची भावना** धरावी. आणि

५. दुःखस्थानी **पश्चात्तापाची भावना** करावी.

त्यांत तृप्ति आणि निर्भयाची स्थानें वर सांगितलीच आहेत.

पारमेष्ठ्य, क्षीराब्धि, विष्णुलोक, पशुपति लोक आणि उमा लोक हीं पांच **संदिग्ध;** येथून पडतो अथवा पडतही नाहीं.

* पारमेष्ठ्य लोकाचाच नियम ह्या चारही लोकांस लागू असल्यामुळें त्यांची व ह्यांची बरोबरी सांगितली.

* स्वर्गादिक जे पुण्यकृत्त लोक ती भोगस्थानें समजून तेथून पडण्याची **भीति** बाळगावी;

* आणि दुःखदायक जे पापमय लोक आहेत त्या ठिकाणीं नेहमी **पश्चात्तापयुक्त** रहात असावें.

* ही सामान्य स्थानांची गोष्ट झाली. परंतु त्या त्या स्थानाप्रमाणें ह्या चार भावनांला अनुसरूनच विशेष भावना जितक्या करतां येतील तितक्या कराव्या.

* कैवल्यांत जाईपर्यंत सर्व भावनांत परमेश्वराचे सहाय्य मात्र घेत असावे. ह्या विशेष भावना कशा कराव्यात ह्याविषयी आणखी कांही उदाहरणें सांगतें.

* ''हा मी एका नरकांत आहे तेव्हा तो नरक मला ज्या पातकांनी प्राप्त झाला आहे, अशा प्रकारची पातके हे ईश्वरा मी आता करणार नाही, येथून मला लवकर काढ,'' अशाप्रकारची पश्चातापाला अनुसरून मी भावना केली,

* आता तसाच एखाद्या कर्मानें मी स्वर्गास गेलो तर, ''हे प्रभो, मला येथें पतनाचे मार्ग पुष्कळ आहेत, अशा भोगस्थानातून मला केव्हा मुक्त करशील?'' तसेंच यज्ञहविर्भागग्रहण वगैरे भावना साधल्यास येथेंच करीत जाव्या.

* आता जसें यमनियमादि स्थानी गेलें तर तेथें त्या त्या प्रमाणें मी भावना केली म्हणजे अहिंसा, सत्य वगैरे मनांत आणले

आणि निर्भय स्थानी ''भगवन् मी आपल्या सहाय्यानेच येथें येऊन निर्भय झालों, आता कांही परोपकार केला पाहिजे.'' अशा प्रकारच्या भावना कराव्यात.

* उपेक्ष्य स्थानी ''प्रभो, आम्ही सर्वथा तुझ्याच अखत्यार आहो. काय करशील ते कर'' इत्यादि भावना कराव्या.

* चांगली भावना करीत असतांही एकादेवेळी वाईट लोकांत जाण्याचा प्रसंग आला तर तें आपल्या कर्माचें फल समजावें.

* तसेंच ज्या लोकांत आपण जाऊं त्या लोकांत येण्यासारखें आपण पुण्य केलें असे समजावे. पुण्याचा अभिमान मात्र होऊं देऊं नये.

* लोकज्ञानावर लक्ष्य पहिल्या अध्यायांतील उत्सर्गापवादावरून (नियम व विकल्पावरून) सहजच रहाण्याजोगें असल्यामुळें त्याविषयी निराळा नियम घालण्यास नको.

* सारांश सात्त्विक राजस तामस लोकांतून सात्त्विक लोकांतील ज्या सत्त्वाच्या भावना असतील त्या सात्त्विक लोकांतच उत्साहयुक्त कराव्यात आणि राजस लोकातील भावनां रजोगुणी लोकांत भीतियुक्त कराव्यात. आणि तामस भावना पश्चात्तापयुक्त कराव्यात.

* अलोकांतील लोकांत शुद्ध सात्त्विक भावना कराव्या. म्हणजे 'मी ब्रह्म आहें' अशीच एक भावना करीत रहावे.

* आणि कैवल्यांत 'मी ब्रह्मच आहें, आता आहें असें मला कशाला म्हटले पाहिजे,' अशाप्रकारचीं भावना जागृत ठेवावी.

* ह्या आर्थी भावना होत नसतील तर शाब्दी भावना अवश्य झाल्याच पाहिजेत. मग त्या मंद लोकांकडून पहिल्या अध्यायाप्रमाणें आणि मध्यम लोकांकडून दुसऱ्या अध्यायाप्रमाणें असल्या म्हणजें झालें. तीव्र लोकांना तर आर्थीभावना निःशेष करितां येतात आणि त्याच उत्तम आहेत. कैवल्यावांचून एकाद्या लोकाची भावना न करितांही मनांत येणे हें कोणत्यातरी जन्मांतील मृदु दशेंतील कर्म आहे असें समजावे.

## *अधिकारी*

पटावरील चित्राविषयी समजूत खोटी असली तरी त्यातील सिद्धांत आणि भावना ह्या अगदीं खऱ्या आहेत अशा प्रकारची ज्याची पक्की समजूत आहे. तोच ह्या खेळाला अधिकारी आहे,

इतरांस खेळूं देऊं नये.

आणि ज्याला खेळावयाची इच्छा झाली असेल त्याला खेळ शिकविणाऱ्या गुरूंनी मुद्दा मुद्दाच्या गोष्टी सांगून त्या त्याजकडून कबूल करवून घेऊन नंतर खेळण्यास आरंभ करूं द्यावा.

## *अनुबंधचतुष्टय*

वर सांगितलेला **"अधिकारी,"** भावनांचा आणि लोकांचा प्राप्यप्रापकभाव **"संबंध,"** त्या लोकांतील साधनांसह भावना करिता येणें आणि त्या लोकांचे ज्ञान होणें हा **"विषय"** आणि कैवल्यांतील सांगितलेली शेवटची भावना क्षणोक्षणीं वाढवीत वाढवीत जन्मभर दृढ राखणें हें **"प्रयोजन;"** याप्रमाणें अनुबंधचतुष्टय तयार झाले.

ही सांख्य म्हणजे वेदान्तमार्गाची रीति सांगितली.

## *योगानुसार भावना*

आता योगमार्गानें भावना करण्याची रीति सांगतें.

शाब्दी आणि आर्थी हे भेद ह्या भावनांतही मानावेत. योगाच्या भावना मुख्य आठच मानाव्यात.

१. भूर्लोकांत असतां आपल्या शरीरांतील **आधारचक्रावर** मन न्यावे.

२. भूर्लोकांत असता आपल्या शरीरांतील **स्वाधिष्टानचक्रा**चे ध्यान करावें.

३. स्वर्लोकांत असता **मणिपुर.**

४. महर्लोकांत असता **अनाहतचक्राचे,**

५. जनलोकांत असता **विशुद्धचक्राचे,**

६. तपोलोकांत असता **द्विदलाचे** आणि

७. ब्रह्मलोकांत सहस्त्रदलाचे ध्यान करावे व

८. अलोकांत कैवल्यावाचून पुरुष प्रकृतीहून निराळा आहे अशा **विवेकाचे**

ध्यान करावें.

ही योगियाला सांगितलेली स्थाने कंदस्थानापासून तो शिखास्थानापावेतों शरीरातच समजावीत. पटावरील चित्रावरून शरीरातील चित्रांवर मन न्यावयाचे एवढाच काय तो भेद. योगाची भावना करीत असतांना पतन झाले तर सिद्धिभोगाचे फल समजावे. कैवल्यात मात्र वेदांती व योगीयांना भावना एकच आहे.

याप्रमाणें योगमार्गाच्या भावना सांगून आता कर्म मार्गातील भावना सांगतो.

## कर्म मार्गातील भावना

कर्म मार्गातील भावनेत ध्यान करावयाचे नसून, ते ते लोक आपल्या शरीरातील कोणत्या ठिकाणीं आहेत एवढें ज्ञान मात्र करून ठेवून विराड् उपासनेंत त्याचे पर्यवसान करावे.

त्यातही शाब्दी व आर्थी असे दोन भेद आहेत.

१. एक विराट पुरुष कल्पून भूर्लोकात असता आपण त्याची लहानशी प्रतिमा बनावे.

२. आणि नंतर भूर्लोकात असलो तर विराटाचे पायाचे ठिकाणी आपण आहोत अशी कल्पना करावी.

३. भूवर्लोकात जानूचे ठिकाणी आहो अशी,

४. स्वर्लोकांत कटीचे ठिकाणी आहो अशी.

५. महर्लोकांत नाभीविषयींची,

६. जनलोकांत हृदयाविषयींची,

७. तपोलोकात कंठाविषयीची,

८. ब्रह्मा, विष्णु, शिव, माया आणि परम लोकांतील उच्च स्थानात असता ललाटाविषयीची भावना करावी.

९. कैवल्यावांचून अलोकांतील स्थानांत शीर्षाची भावना करावी आणि कैवल्यांत पुनः सर्वांची भावना एकच आहे.

ह्या प्रमाणें सर्व भावना सांगितल्या. त्यांचे भेद पुष्कळ आहेत ते त्या त्या ग्रंथातून जाणून शक्य तेवढ्या भावना कराव्या.

कर्म, योग आणि ज्ञान ह्या तीन मार्गांप्रमाणें भावना सांगितल्या; परंतु ''खेळणारे जर निरनिराळ्या मार्गाचे असतील तर कोणकोणत्या मार्गाची भावना करितो हें निराळें एका कागदावर लिहून ठेवून त्या त्याप्रमाणें डाव देत चलावें,' 'एका मार्गाचे सर्व खेळणारे असतील तर ही भानगड नाहीं - परंतु मंद, मध्यम, तीव्रांचा भेद ओळखावा. तीव्र भावनेंतून मध्यम भावनेंत येणें वगैरे च्युत होण्याला कारण असल्यामुळें आपल्याला झेपेल अशीच भावना करावी. पहिलेच तीव्र भावना करून पतन करून घेऊं नये. कोणी तोंडानें आपली शाब्दी भावना बोलण्यात लाजेल तर त्याच्या चेहऱ्यावरून अनुमान करून समजून घ्यावें. ही गोष्ट उत्तम प्रेक्षकाला लागू आहे.

हें ज्ञान मात्र एक ठेविलें पाहिजे कीं अविद्येंतून भेदभावनेत यावयाचें आणि नंतर तेथल्याच सर्पांतून नरकात जावयाचें. अविद्यावर्तांतही ही गोष्ट लागू करावी. ह्या खेळांत भावना मात्र इष्टच करावयाच्या. पण ह्या खेळापासून ज्ञान इष्टानिष्ट गोष्टींचेंही होतें. ह्या खेळांत गुरुशिष्यपद्धति मोडत नाहीं हे एक विशेष आहे. असो.

## उद्देश

कैवल्यातील उत्तम भावना दृढ होऊन जन्मभर रहावी किंवा खेळतां खेळतां पुष्कळ दिवस खेळल्यामुळें मरते वेळेंस तरी ती भावना उत्पन्न व्हावी, हाच आमचा खेळ काढण्याचा उद्देश आहे.

भावना करून खेळत असतां ते ते लोक मृदुसंवेगानें तरी प्राप्त होतात ही गोष्ट योगवासिष्टावरून सिद्ध असल्यामुळें त्यापासून

खात्रीनें वेदान्तिक नफा होतो असें आम्ही स्पष्ट म्हणतों. ह्याचाच मध्य संवेग झाला म्हणजे स्वप्नांत व तीव्र संवेग झाला म्हणजे प्रत्यक्ष प्राप्ति होणे अगदीं साहजिक आहे.

हा अध्याय थोडासा कठिण आहे खरा तथापि खेळामध्यें जो मुख्य असेल त्यानें अवश्य समजून घेतलाच पाहिजे. किंवा हें पुस्तक तरी पुढें ठेवून खेळलें पाहिजे. ज्याला खेळाची माहिती आहे असा एक मनुष्य प्रेक्षक असला पाहिजे. आणि कोणाची भावना कोठें चुकते ह्याबद्दल शिक्षेचा अधिकार त्याचेकडेच असला पाहिजे.

आर्थीभावना करणारानें देखील आपली भावना ह्या प्रेक्षकास कळण्याकरितां तोंडानें बोलून दाखवावी. आणि अशा प्रकारचा कोणी प्रेक्षक मिळत नसेल तर कैवल्याला गेलेला एकादा पुरुष नंतर प्रेक्षक करून ठेवावा आणि तेंही जमत नसेल तर प्रेक्षकाचें काम पटांतल्या पटांत ब्रह्मदेवानें करावें.

## *फलप्राप्ति*

हा खेळ कांहीं काम कोणाला नसेल आणि ग्रंथ वाचण्याचेंही कार्य नसेल तर त्याने शक्य अशा भावनापूर्वक पाहिजे तितके वेळ खेळावा – व नंतर **रात्रौ स्वप्नांत काय चमत्कार होतो तो पहावा** – पण खेळाकडे मात्र चित्त पाहिजे.

असें सात्त्विक स्वप्न वृद्धी होऊं लागलें म्हणजे 'स्वप्ननिद्राज्ञानावलंबनं वा' ह्या पतंजली स्वामींच्या सूत्रांवरील 'स्वप्नज्ञानावलंबन' या व्यास भाष्यांतील प्रतीकांत सांगितल्याप्रमाणें

योगसिद्धी होऊन कैवल्य मिळेल. ही गोष्ट सप्रमाण सिद्ध आहे.

इतका आणि असा वेळ मिळत नसेल तर - **आठ दिवसातून दोन वेळ किंवा एक वेळ तरी निदान खेळण्याचा नियम करावा.**

ह्याप्रमाणें हा खेळ वेदान्तात एक प्रक्रियामार्गच होऊन बसला आहे यांत संशय नाहीं. ह्या खेळात गुरुशिष्यपद्धती मोडत नाहीं, हें एक विशेष आहें.

नियम - खेळातून विशेष जरूरीचें काम असल्याशिवाय उठून जाऊं नये.

अपवाद - ब्रह्मा होण्याची अडचण पडल्यास पटावर पाहून उत्तम मनुष्यानें दान टाकावें. भावना चुकतील अशा तामस गोष्टी करूं नयेत. सर्व मोक्षात गेलें असता एकाद्याने परोपकार करावा.

**हरिः ॐ तत्सत् यदेतं कथितं तत्सर्वं श्रीमत्सद्गुरु ज्ञानेश्वरमहाराज चरणयोस्समर्पणमस्तु ॥ इत्यनेनालम् ॥**

**॥ श्रीमत्सद्गुरु सर्वत्र यशस्वी श्रीज्ञानेश्वर महाराज की जय ॥**

---

***टीप :-*** *कोणी आमच्या खेळास त्रिकाळदर्शी आरशाप्रमाणें समजतील. परन्तु वास्तविक या दोहोंत मोठा भेद आहे. तो असा कीं त्रिकाळदर्शी आरशाविषयीं प्रथम योगाच्या भावना साधून नंतर आरशांत पहावें लागतें - म्हणजे चैतन्यांतून जडांत यावें लागतें, तेव्हां देवतांचें दर्शन होतें - ही रीतीच मुळीं विचित्र आहे - कारण चैतन्यांतून जडांत येण्याची रीति कोणत्याच धर्मानें सांगितली नाही -*

*परन्तु आमच्या खेळाची गोष्ट तशी नाहीं - तर त्याच्या अगदीं उलट आहे, - म्हणजे आमच्या ह्या रेखाटलेल्या*

*जडचित्रपटावरून योगरूपी भावना वाढवून चैतन्यांत जाण्याचा सनातन व सुलभ मार्ग सांगितला आहे - ही रीति प्राचीन मूर्तीप्रमाणें किंवा सर्वतोभद्रांतील मंडलाप्रमाणें असून प्राचीन संतांनी जे पूर्वी असे खेळ काढले आहेत त्यांचीही ह्याला सम्मति आहे. असें उघड दिसतें.)*

| शिडीचा आरंभ | | शिडीचा शेवट |
|---|---|---|
| ३ अविद्यादिद्दक्षा | - | मूला विद्या २५९ |
| ७ श्रद्धा | - | संपदतिसंपदउपासना २९ |
| ९ परोपकार | - | पुण्य ४९ |
| १३ श्रवण | - | समन्वय ३५ |
| १८ दहराद्युपासना | - | अंहग्रहोपासना ३९ |
| २२ संन्यास | - | मुमुक्षुत्व ४५ |
| २४ कला | - | राजमंदिर ६९ |
| २५ उपासना | - | गौणीभक्ति ५३ |
| ३२ तीव्रमुमुक्षा | - | सद्‌गुरुसेवा ९४ |
| ३३ बौध्य | - | शून्य लोक |
| ३८ म्लेच्छमत | - | बेहस्त लोक |
| ४१ ध्यान | - | संप्रज्ञान समाधि ८६ |
| ४३ विद्याभ्यास | - | शास्त्र ६६ |
| ४७ स्मरण | - | सख्य ९२ |
| ५५ अर्हन्‌मुक्ति | - | आत्मपरिभाण लोक |
| ५९ तीव्र अनुताप | - | शुद्धि ८१ |
| ६२ ऐन्दवसम प्रक्रिया | - | पर्यंक २३७ |
| ७३ योग | - | विवेक ख्याति १०९ |

| | | |
|---|---|---|
| ७४ सत्कर्म | - | चित्तशुद्धि ९८ |
| ७६ विवेक | - | निदिध्यासन १०१ |
| ८७ ब्राह्मण्य | - | अपरवैराग्य ११४ |
| ९० मातृपितृसेवा | - | पितृलोक १८८ |
| ९७ तप | - | मोक्ष २३६ |
| १०० धूममार्गादि | - | चंद्रलोक १९९ |
| १०२ ज्ञानेश्वरी | - | वेदान्त लोक २६५ |
| १०४ कर्मसमुच्चिदुपासनालोक | - | मोक्ष २३६ |
| १०५ गोब्राह्मणरक्षण | - | अजानजदेवानंद १९६ |
| ११० पातिव्रत्य | - | मोक्ष २३६ |
| ११३ शतजन्मब्रह्मकर्मसमुच्चय | - | पर्यंक (ब्रह्मदेव) २३७ |
| ११६ पंढरी | - | क्षीराब्धि २४५ |
| ११८ पंचमार्ग | - | उमालोक २३८ |
| १२० काशी | - | पशुपतिलोक २३९ |
| १२२ गोदा नदी | - | इंद्रलोक २०१ |
| १२४ यज्ञ | - | कर्म देवानंद २०० |
| १२६ कमलासन | - | पर्यंक २३७ |
| १२७ बद्रिकेदार गंगा हिमालय | - | कूटस्थ ध्यान २६४ |
| १२८ श्रीज्ञानेश्वरचरणोदकतीर्थ | - | जीवन्मुक्ति २८३ |
| १३० पातंजलयोग | - | क्लेशहानि २५८ |
| १३२ योगवासिष्ठ | - | वेदान्तलोक २६५ |
| १३४ वैशेषिक | - | दुःखध्वंस २५२ |
| १३६ परवैराग्य | - | गुणातीतत्व २७४ |
| १३८ पंचाग्नि उपासना | - | पारमेष्ठ्य,कल्पनोत्थान २३५ |
| १४२ न्याय | - | एकविंशति दुःखनाश २५५ |
| १४५ राधादिव्रजगोपिका माधुर्य भक्ति | - | आदि वैकुंठ लोक २७१ |

| | | |
|---|---|---|
| १४८ पाणिनीय लोक | - | नंदनवन २०२ |
| १४९ ज्ञान वैराग्य विरक्ति उपरति | - | श्रीमत्सद्गुरु ज्ञानेश्वर अभयदान २८१ |
| १५३ चतुर्धाम तीर्थ | - | विष्णु लोक २४१ |
| १५६ वृंदावन | - | गोलोक २४७ |
| १५७ सुस्वप्न | - | देव गंधर्वानंद १९२ |
| १५८ अयोध्या | - | विष्णु लोक २४१ |
| १६० मांडूक्यगत निवृत्त प्रणवोपासना | - | निर्गुणस्थान २७२ |
| १६१ हरिद्वार | - | विष्णु लोक २४१ |
| १६२ प्रयाग | - | क्षीराब्धि २४५ |
| १६५ विरोध भक्ति | - | क्षीराब्धि २४५ |
| १६६ परमहंस | - | सोहंवस्तू २६१ |
| १६७ अर्चिरादि मार्ग | - | मोक्ष २३६ |
| १६८ विशिष्टाद्वैतादिश्रुतिविरुद्धधर्मी परमेश्वरस्वीकार | - | मुनिमानभंग २४२ |
| १६९ भागवत | - | पराभक्ति २७७ |
| १७७ अग्नि | - | नंदनवन २०२ |
| १७९ विनायक लोक | - | पशुपति लोक २३९ |
| १८१ एकत्र त्रयाभ्यास | - | जीवन्मुक्ति २८३ |
| १८४ कुंडलिनी | - | उन्मनि २६६ |
| १९० गणपत्यथर्वशीर्षोपासना | - | महागणपति २६८ |
| १९५ प्रस्थानत्रय | - | वेदान्तलोक २६५ |
| १९७ अर्घ्यप्रदानादित्यहृदयादिदैविक सूर्योपासना | - | शुद्ध भास्कर २६७ |
| २०४ व्यतिरेकान्वय | - | भूमा २७९ |
| २०८ बृहस्पतिलोक | - | सप्तर्षि लोक २२४ |
| २१० गायत्री उपासना | - | आदिशक्ति २६९ |

२१५ आत्मनिवेदन - तुर्या २७३
२१७ जीवब्रह्मैक्य - निश्चित मुक्ति २८२
२२३ ब्रह्मवित् संप्रदाय - परमशिव लोक २७०
२२५ ब्रह्मर्षि लोक - जीवन्मुक्ति २८३
२८० अमृतानुभव सिद्धानुवाद - निष्क्रीयतावच्छिन्न अद्वैतज्ञानगतसहजभक्ति २८५

| सापाचे मुख | सापाची शेपटी |
|---|---|
| २६३ भगवद्भक्ति अभाव | - महानरक |
| २५९ मूलाविद्या | - भेदभावना १०३ |
| २५६ अंधतामिस्त्र लोक | - महानरक |
| २५४ तामिस्त्र लोक | - अंधतामिस्त्र लोक २५६ |
| २५१ मोह लोक | - मनुष्य १ |
| २४९ तम | - पैशाच लोक १७८ |
| २४८ भक्तजनकलहावच्छिन्न परस्पर शापदान | - गोकुल १५४ |
| २४४ स्व-स्व-आगमाग्रह | - महानरक |
| २४२ मुनिमानभंग | - राक्षस लोक १८३ |
| २४०परोपास्यद्रोह | - महानरक |
| २३५ पारमैष्ठ्य | - रमणीय स्थान १५१ |
| २३४ कल्पनोत्थान | - रमणीय स्थान १५१ |
| २२९ आराज्य | - मनुष्य १ |
| २१६ प्रलय | - मनुष्य १ |
| २१४ भक्त्यभिमान लोक | - सत्कुल ६७ |
| २०९ राजस अंहकार | - मनुष्य १ |

| | | |
|---|---|---|
| २०६ ब्राह्मण अपमान | - | महानरक |
| २०३ पंचाग्नि पतन मार्ग | - | मनुष्य १ |
| १९४ तपनाश | - | महानरक |
| १८७ जारणमारणादि | - | महानरक |
| १८२ बीभत्स आचरण | - | महानरक |
| १८० घोर पातके | - | महानरक |
| १७१ दक्षिणद्वार | - | महानरक |
| १६४ योगच्युत | - | सत्कुल ६७ |
| १५५ गुरुद्रोह | - | जातमृत्यु २ |
| १४७ विज्ञानवाद | - | क्षणिक वाद ७७ |
| १४६ उपासनारहित कर्म | - | तमोभूमि ५६ |
| १४४ सर्वास्तित्ववाद | - | नास्तिक्य २६ |
| १४१ दुःस्वप्न | - | महानरक |
| १३९ उन्माद | - | प्रमाद ८५ |
| १३७ परधनाभिलाष | - | महानरक |
| १३५ मूर्च्छा | - | शोक ५० |
| १२९ विषयानुराग | - | संग १०६ |
| १२५ कुटुंबकलह | - | महानरक |
| ११९ ब्रह्महत्या | - | महानरक |
| ११७ वरिष्ठ आज्ञाभंग | - | महानरक |
| ११५ ब्रह्मद्वेष | - | महानरक |
| १११ ब्रह्मविद्वेष | - | महानरक |
| १०८ भय | - | महानरक |
| १०६ संग | - | काम ७२ |
| १०३ भेदभावना | - | महानरक |
| ९६ पंचमहापातके | - | महानरक |

| | | |
|---|---|---|
| ९१ विद्याभिमान | - | पंचाभिमान ६५ |
| ८८ क्षुद्र पातके | - | महानरक |
| ८४ कपट | - | महानरक |
| ८० धर्मलोप | - | पापयोनि १२ |
| ७७ क्षणिकवाद | - | नास्तिक्य २६ |
| ७२ काम | - | क्रोध ६० |
| ७० हर्ष | - | खेद ४ |
| ६४ धर्मपत्नीमनोभंग | - | महानरक |
| ६० क्रोध | - | संमोह ३७ |
| ५८ पंक्ति प्रपंच | - | महानरक |
| ५२ धर्मांतर | - | बुद्धिनाश ११ |
| ४८ हिंसा | - | महानरक |
| ४६ संयमजन्यसिद्धिभोग | - | मनुष्य १ |
| ४४ आलस्य | - | निद्रा १४ |
| ४२ अन्यप्रति शापदान | - | सुकृतहानि १९ |
| ४० प्रजापीडन | - | महानरक |
| ३७ संमोह | - | स्मृतिविभ्रम २३ |
| ३१ दुर्वासना | - | नास्तिक्य २६ |
| २६ नास्तिक्य | - | महानरक |
| २३ स्मृतिविभ्रम | - | बुद्धिनाश ११ |
| २१ पीडा | - | पापयोनि १२ |
| १७ तामस अहंकार | - | दुःख १५ |
| ११ बुद्धिनाश | - | मरण |

oooooooooooooooooooooooooooooooooooooooo

## श्रीमहाराजांच्या सूक्तिरत्नावली-यष्टीनुसार मूल्यसूचि

| | | |
|---|---|---|
| (यष्टि १) | | रु ४० |
| (यष्टी २) | पूर्वार्ध | रु.४० |
| ( " ) | उत्तरार्ध | रु.५० |
| (यष्टी ३) | प्रियलीलामहोत्सव आमंत्रण विलास | रु.९० |
| (यष्टी ४) | स्त्रीगीत संग्रह | रु.४० |
| (यष्टी ५) | अलौ.व्याख्यानमाला | रु.५० |
| (यष्टी ६) | स्वमन्तव्यांश-सिद्धान्त-तुषार (हिंदी) | रु.५० |
| (यष्टी ७) | ३७ पत्रे | रु.५० |
| (यष्टी ८) | साधुबोध | रु.५० |
| (यष्टी ९) | पूर्वार्ध : अभंगांची गाथा | रु.१०० |
| ( " ) | उत्तरार्ध : पदांची गाथा | रु.१०० |
| (यष्टी १०) | प्रेमनिकुंज | रु. ७५ |
| (यष्टी ११) | संप्रदायसुरतरू २ भागात | रु.१६० |
| (यष्टी १२) | पत्रे ४५ | रु.७० |
| (यष्टी १३) | सुखवरसुधा आणि वेदान्तपदार्थोद्देशदीपिका | रु.५० |
| (यष्टी १४) | सांख्य,भक्तिभाष्य,भागवतभाष्य | रु.८० |
| (यष्टी १५) | | रु.२० |
| (यष्टी १६) | संस्कृत भा.१ / १४ सूत्रग्रंथाः | रु.२० |

( १६ ) संस्कृत भा.२ / १७ ग्रंथाः रु.५०
(यष्टी १७) समयोपदेश : सुबोध हिंदुधर्म रु.८०
(यष्टी १८) समयोपदेश : स्फुट निरूपणे रु.५०
(यष्टी १९) मनोहरिणी (हिंदी) रु.५०
(यष्टी २०) योगप्रभाव (गद्य) रु.१००
'श्रीमहाराजांचे चरित्र' त्रिपुरवारकृत रु.१००
'माधुर्यमधुकोश' महाराजांच्या ग्रंथांतील विषयसूचि रु.३००
१३० ग्रंथांचा सारांश रु.२०

---

श्रीगुलाबरावमहाराजांचे उत्तराधिकारी

## श्रीबाबाजीमहाराज पंडित यांचे ग्रंथ

१. **आर्यधर्मोपपत्ति** (रु.५०)
२. **हरिपाठ-रहस्य** (रु.६०)
३. **अमृतानुभवकौमुदी** (म/हिं) (रु.१००)
४. **ज्ञाने.गूढार्थदीपिका** .पृष्ठे १००० (रु.३००)
(,,) गीताप्रेस मराठी (रु.१२५)
(,,) हिंदी प्रत (रु.५००)
५. **अभंगगाथा** (रु.६०)
६. **विविध लेखसंग्रह** (रु.१००)
७. **संतकथा** (रु.१५)
८. **पंचदशी प्रवचने**
९. **भागवत प्रवचने**

॥ संपर्क ॥

**श्री ज्ञानेश्वर मधुराद्वैत सांप्रदायिक मंडळ, दहीसाथ, अमरावती**

